**<u>अरुणा मध्यम प्रकल्प, ता.वैभववाडी, जि. सिंधुदूर्ग</u>**
**द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्ताव.......**

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्र. सुप्रमा २०११/२१८/(८२/११)/मप्र.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-०५ऑक्टोंबर, २०११.

पहावे :- १) शासन निर्णय पाटबंधारे विभाग क्र. अरुणा/जसंअ/१०८५/(२०९/८६), दिनांक ०५/१२/१९९५.
२) शासन निर्णय पाटबंधारे विभाग क्र. सुप्रमा/अरुणा/२००८/४०६/८७/०८/म.प्र., दिनांक २९/०४/२००९.

**<u>प्रस्तावना :-</u>** सिंधुदूर्ग जिल्हयातील वैभववाडी तालुक्यातील अरुणा मध्यम प्रकल्पास शासन निर्णय क्र. अरुणा/जसअं/१०८५/(२०९/८६), दिनांक ०५/१२/१९९५ अन्वये प्रकल्पास रुपये ५३९४.२२५ लक्ष (रुपये त्रेपन्न कोटी चौ-याण्णव लक्ष बावीस हजार फक्त) किंमतीस मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तद्नंतर दरसूचीतील वाढ, भुसंपादन किंमतीतील वाढ, अभियांत्रिकी बदलामुळे प्रकल्पाचे किंमतीत वाढ झाल्यामुळे शासन निर्णय क्र. सुप्रमा/अरुणा/२००८/४०६/८७/०८/म.प्र., दिनांक २९/०४/२००९ अन्वये प्रकल्पास रुपये ३०१०३.५५ लक्ष (रुपये तीनशे एक कोटी तीन लक्ष पंचावन्न हजार फक्त) एवढया किंमतीस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. या मान्यता प्राप्त रकमेस तुलना करुन प्रकल्पाच्या व्दितीय सुधारित अंदाजपत्रकिय किंमत रक्कम रु. ६६९७९.७५ लक्ष मान्य करण्याचे प्रस्तावित होते. प्रकल्पाच्या किंमतीत झालेली वाढ मुख्यत्वे दरसुचीमुळे झालेली वाढ, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक यांचेकडून प्राप्त सुधारीत संकल्पनामुळे झालेली वाढ, भुसंपादन दरातील वाढ तसेच उंची वाढीमुळे नव्याने कराव्या लागणारी भुसंपादन तरतूद, जादा दराची निविदा स्वीकृती, स्वामीत्व शुल्कातील वाढ, पुनर्वसन कामाचे किंमतीमध्ये झालेली वाढ इत्यादी बाबींमुळे आहे.

यासाठी कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांनी त्यांचे पत्र क्र.कोपाविम/तां-१/अरुणा/द्विसुप्रमा/७९२/सन २०११, दिनांक २३/०२/२०११ अन्वये प्रकल्पाचा द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता अहवाल मंजूरीसाठी शासनास सादर केलेला होता, त्यास मान्यता देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**<u>शासन निर्णय :-</u>**

शासनाकडून आता या निर्णयाद्वारे सिंधुदूर्ग जिल्हयातील वैभववाडी तालुक्यातील अरुणा मध्यम प्रकल्पाच्या कामासाठी सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारित रु. ६६९७९.७५ लक्ष (रुपये सहाशे एकोणसत्तर कोटी एकोणऐंशी लक्ष पंचाहत्तर हजार फक्त) एवढया रकमेस द्वितीय

सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रुपये ६११०१.४४ लक्ष (रुपये सहाशे अकरा कोटी एक लक्ष चव्वेवाळीस हजार फक्त) कामाप्रित्यर्थ व रुपये ५८७१.३१ लक्ष (रुपये अठ्ठावन्न कोटी एकाहत्तर लक्ष एकतीस हजार फक्त) अनुषंगिक खर्च आहे. सोबत सहपत्र-१ मध्ये सुधारित उपशीर्षवार तरतूद व सहपत्र-२ मध्ये सुधारित सर्वसाधारण गोषवारा दिला आहे.

१. सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकिय प्रस्तावाच्या तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

२. या प्रकल्पामुळे सिंधुदूर्ग जिल्हयातील वैभववाडी तालुक्यातील डोंगराळ भागातील ५३१० हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे. प्रकल्पाचे लाभव्यय परिमाण १.५६५ आहे.

३. या योजनेच्या कामावर होणारा खर्च लेखाशीर्ष आय-५/४७०१ मोठे व मध्यम प्रकल्प यावरील भांडवली खर्च-८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (०२) (०३) कोकण पाटबंधारे विकास या महामंडळास भाग भांडवली अंशदान (योजना अंतर्गत) (४७०१ एच ७५४) याखाली खर्ची टाकावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा निर्णय शासन पाटबंधारे विभाग निर्णय क्र.संकीर्ण १०९९/(१२६/९९) मोप्र (प्र) दिनांक १८.५.१९९९ च्या आदेशातील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

अ) प्रकल्पाकरीता आवश्यक जमिनीचे संपादन केल्याशिवाय त्यावरील कामाकरीता निविदा प्रक्रीया सुरु करण्यात येऊ नये. तसेच जमिनीच्या संपादनाशिवाय त्यावरील प्रकल्पाच्या कोणत्याही दायित्वास मान्यता देऊ नये.

ब) सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावास ढोबळमानाने तरतूद करु नये.

क) प्रकल्पावरील खर्च प्रशासकीय मान्यतेपेक्षा जास्त होण्याचे संकेत प्राप्त होताच सुधारित मान्यतेचा प्रस्ताव सादर करण्यात यावे. प्रशासकीय मान्यतेपेक्षा जास्त खर्च करण्यात येणार नाही याविषयी दक्षता घ्यावी.

ड) वित्त विभागाने वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उप विभाग-एक ते पाच (सर्व विभागांना समान असलेले वित्तीय अधिकार) मध्ये दि.१५ मे,२००९ च्या शासन निर्णय क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियमद्वारे सुधारणा केलेल्या आहेत. त्यानुसार स्पष्टीकरणात नमुद केल्याप्रमाणे ज्या प्रकरणी प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांची मर्यादा ओलांडली जाईल त्या प्रकरणी संबंधित प्राधिका-यास जबाबदार धरण्यात येईल.

ई) यापुढे महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिकेमधील अनुच्छेदानुसार तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेतील अटी व शर्तीनुसारच विभागाने काटेकोरपणे खर्च करावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०११११००५१६००३०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सहपत्र : वरीलप्रमाणे १ व २

(म.गु. वानखेडे)
शासनाचे अवर सचिव

**( म. गु. वानखेडे )**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत सहपत्रासह अग्रेषित :-

महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
वित्त विभाग (व्यय-१२) अर्थ-२, अर्थ-१०, व्यय-६ अ, मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
मुख्य अभियंता (द.व.प्र) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
आंतरवित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, दक्षिण कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, ओरोस.
कार्यकारी अभियंता, मध्यम प्रकल्प विभाग, आंबडपाल, ता.कुडाळ, जि. सिंधुदूर्ग.
स्वीय सहायक, मा.मंत्री (जलसंपदा) (कृ.खो.पा.वि.महामंडळ वगळून) मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (लाभक्षेत्र विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, उप सचिव (मोप्र-२) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासने : जसंअ, निवसं-१, अर्थ-१, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मध्यम प्रकल्प, कार्यासन संग्रहार्थ
निवड धारिका

**तक्ता क्रमांक १**
**अरुणा मध्यम प्रकल्प ता. वैभववाडी, जि.सिंधुदूर्ग**
**शासन निर्णय क्र. सुप्रमा २०११/२१८/(८२/११)/ मध्यम प्रकल्प**
**दिनांक ०५ ऑक्टोंबर, २०११.**
**चे सहपत्र**
**द्वितीय सुधारित अंदाजपत्रक उपशिर्षवार तरतुदी**

| **अ.क्र.** | **उपशीर्ष** | **सुधारित प्रस्तावित अंदाजपत्रक (रुपये लक्ष)** |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| १) | 'अे'प्राथमिक सर्वेक्षण | ४९४.५४ |
| २) | 'बी' भूसंपादन | १२९०१.०३ |
| ३) | 'सी' कामे | ३७०९५.६७ |
| ४) | 'डी' विमोचक | १५६१.५५ |
| ५) | 'ई' फॉल्स | १२७.११ |
| ६) | 'एफ' आर.एच.टी.कामे | १४७६.६६ |
| ७) | 'जी' ब्रिजेस | ३६०.६० |
| ८) | 'एच' एस्केप | ३०.५५ |
| ९) | 'के' इमारती | १३५.३० |
| १०) | 'एल' मातीकाम | ६३७०.५६ |
| ११) | 'एम' वृक्षारोपण | १२.६७ |
| १२) | 'ओ' संकिर्ण | ३९.०५ |
| १३) | 'पी' देखभाल व दुरुस्ती | १४३.४८ |
| १४) | 'क्यू' हत्यारे व संयत्रे | २५.८५ |
| १५) | 'आर' दळणवळण | १३८.०० |
| १६) | 'एक्स' पर्यावरण | २०.६० |
| १७) | वितरीका-भाग-३ | १३३.७५ |
| १८) | इतर किरकोळ | ४१.४६ |
| १९) | जलविद्युत | ० |
| | एकूण कामाप्रित्यर्थ | ६११०१.४४ |
| | आस्थापना व अनुषंगिक खर्च | ५८७१.३१ |
| | **एकूण** | **६६९७९.७५** |

**तक्ता क्रमांक २**
**अरुणा मध्यम प्रकल्प ता. वैभववाडी, जि.सिंधुदूर्ग**
**शासन निर्णय क्र. सुप्रमा २०११/२१८/(८२/११)/ मध्यम प्रकल्प**
**दिनांक ०५ ऑक्टोंबर, २०११.**
**चे सहपत्र**
**द्वितीय सुधारित अंदाजपत्रक सर्वसाधारण संकलित गोषवारा**

| अ.क्र. | विवरण | रक्कम (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| (अ) | **प्रत्यक्ष खर्च** | |
| | १) शीर्षकामे | ५०६३०.८१ |
| | २) कालवे व वितरीका | १०३०२.४२ |
| | ३) वितरीका व वितरण व्यवस्था | १७५.२१ |
| | **एकूण (अ)** | **६११०१.४४** |
| (ब) | **अधिक** | |
| | १) आस्थापना खर्च (ब-जमिन वगळून) १० टक्के | ४८२०.७४ |
| | २) हत्यारे व अवजारे १.०० टक्के दराने (ब-जमीन क्यू हत्यारे वगळून | १२९.२७ |
| | ३) लिव्ह व पेन्शनरी चार्जेस २.५ टक्के (आस्थापना खर्चावर) | ४८.२१ |
| | ४) संग्रहावरील तूट ०.२५ टक्के | ११९.२२ |
| | **एकूण (ब)** | **५११७.४३** |
| | **एकूण (अ+ब)** | **६६२२५.८८** |
| (क) | **वजाती** | |
| | १) विशेष टी ॲड पी वाहनावर (७५ टक्के) वैयक्तीक वहाने वगळून येणा-या रकमेवर | १९.३९ |
| | २) वैयक्तिक वाहनावर २० टक्के दराने | ५.१७ |
| | ३) तात्पुरत्या इमारतीच्या किंमतीवर १५ टक्के दराने | ८.७० |
| | **एकूण वजाती (क)** | **(-) ३३.२६** |
| | **एकूण प्रत्यक्ष खर्च (अ+ब) - (क)** | **६६१९२.६१** |
| (ड) | **अप्रत्यक्ष खर्च** | |
| | १) वाहीतीलायक क्षेत्राच्या ५.५० टक्के दराने जमीन महसूल | ५१.४० |
| | २) लेखा व परीक्षण खर्च १.० टक्के ( बी जमीन वगळून) | ४९४.७० |
| | ३) सचिवालय चार्जेस (आस्थापनेच्या खर्चावर ०.५० टक्के दराने) | २४१.०४ |
| | **एकूण अप्रत्यक्ष खर्च (ड)** | **७८७.१४** |
| | **एकूण खर्च (कामे) (अ)** | **६११०१.४४६** |
| | **आस्थापनेवरील खर्च (ब)-(क)+(ड)** | **५८७१.३१** |
| | **प्रकल्पाची एकूण किंमत** | **६६९७९.७५** |